हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम, २०२४ (सन २०२५ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ७) - हैद्राबाद इनाम निर्मूलन व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम १९५४ च्या कलम २(ए) व कलम ६ मध्ये करण्यात आलेली सुधारणा

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक बैठक-२०२४/प्र.क्र. ९५/ज-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक ३ मार्च, २०२५

**वाचा :-**

१. हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम २०१५ (सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२५)
२. दिनांक १३.०८.२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय
३. हैद्राबाद इनाम निर्मूलन व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अध्यादेश, २०२४ ( सन २०२४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ८)
४. सम क्रमांकाचे दिनांक ०८ ऑक्टोबर २०२४ चे परिपत्रक.
५. सन २०२५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७-दिनांक ०१/०१/२०२५

**प्रस्तावना :-**

मराठवाडा विभागातील मदतमाश इनाम जमिनींना हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ मधील तरतूदी लागू होतात. मराठवाड्यातील आठ जिल्ह्यांमध्ये हैद्राबाद इनामे व रोख अनुदान रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ चे कलम ६(१) च्या तरतूदीनुसार शासन परिपत्रक, महसूल विभाग क्रमांक HIA १०५९ VI-L, दि.०९.०७.१९६० अन्वये सुचित केल्यानुसार तत्कालीन परिस्थितीमध्ये दि.०१.०७.१९६० रोजी इनामदार यांच्याकडील जमीनी खालसा (Abolition) करुन शासनाकडे निहित करण्यात आल्या. तसेच, या अधिनियमाच्या कलम ६ (३) अन्वये सक्षम अधिकारी यांच्या पूर्वपरवानगीशिवाय हस्तांतरण व विभाजन करण्यास प्रतिबंध ठेवून नवीन अविभाज्य भोगवटादार २ च्या शर्तीवर इनामदार, काबीज-ए-कदीम, कायम कुळ व साधे कुळ यांचेकडून जमीनीचे तत्कालीन परिस्थितीत नजराणा/भोगवटा मुल्य घेवून पुनःप्रदान (Regrant) करण्यात आले आहे. मराठवाडा विभागातील मदतमाश इनाम जमिनींच्या हस्तांतरणावर हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ चे कलम ६ (३) अन्वये निर्बंध होते. मराठवाडा विभागात मोठ्या प्रमाणावर शेतकऱ्यांनी इनाम जमिनी धारण केलेल्या आहेत. या जमिनींचे बेकायदेशीररित्या हस्तांतरणे झालेली आहेत. या जमिनीवरील निर्बंध कमी करण्यासाठी हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ च्या कलम ६ मध्ये सन २०१५ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तथापि, त्यानंतरही या इनाम मिळकतीच्या हस्तांतरणासंदर्भात आणखी काही निर्बंध कमी करणे

आवश्यक होते. तसेच अधिनियमाच्या कलम २ (ए) (३) मध्ये नमूद १ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर अपवादात्मक प्रकरणी उप कलम (१) अन्वये घेण्यात आलेल्या प्रकरणांची कायदेशीर वैधता, नियमितता तपासण्यासाठी एक वर्षाच्या कालावधीची मर्यादा वाढविणे आवश्यक होते.

सदर जमिनीची उपयोगिता वाढविण्यासाठी तसेच अशा जमिनीचा कालानुरूप वापर करणे शक्य व्हावे यासाठी करण्याच्या हेतूने कायद्यात सुधारणा करण्याची गरज निर्माण झाली होती. याकरिता नियुक्त करण्यात आलेल्या समितीच्या शिफारशीस अनुसरुन राज्य मंत्रिमंडळाच्या दि.१३.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार उक्त अधिनियमाच्या कलम २ (ए) व कलम ६ मध्ये दि. २४.०९.२०२४ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अध्यादेश, २०२४ (सन २०२४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ८) अन्वये सुधारणा करण्यात आली होती. या अध्यादेशाचे अधिनियमात रुपांतर करण्यासाठी हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम, २०२४ (सन २०२५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७) महाराष्ट्र शासन राजपत्र, असाधारण भाग ४ मध्ये दिनांक १ जानेवारी २०२५ रोजी प्रसिद्ध करण्यात आला आहे. हा अधिनियम दिनांक २४ सप्टेंबर २०२४ रोजी अंमलात आलेला आहे. त्यानुषंगाने सर्व संबंधीतांना सूचना निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम, २०२४ (सन २०२५ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ७) याची प्रत जोडली असून हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ च्या कलम २ (ए) व कलम ६ मध्ये या अध्यादेशाव्दारे करण्यात आलेल्या सुधारणेची अंमलबजावणी सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी. यापुढे हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ अंतर्गत येणाऱ्या मदतमाश जमीनी भोगवटदार वर्ग-१ मध्ये रुपांतरीत करण्यासाठी/कृषीतर प्रयोजनासाठी करण्यात आलेली हस्तांतरणे नियमित करणेसाठी ५०% ऐवजी ५% इतकी नजराणा रक्कम आकारण्यात यावी. लागू असलेल्या प्रकरणी दंडाच्या रकमेत कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

२. हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ चे कलम २ (ए) नुसार सक्षम न्यायालयाच्या निर्णयामुळे कोणत्याही जमीनीबाबतचा वाद वरीष्ठ न्यायालयात गेल्यानंतर न्यायालयाच्या निर्णयानुसार कार्यवाही करण्याचे बंधन संबंधीत यंत्रणेवर राहील. विशेषत: इनाम जमीन मदतमाश आहे किंवा खिदमतमाश आहे याबाबतचा वाद मा. उच्च न्यायालयात अथवा मा. सर्वोच्च न्यायालयात गेल्यास व मा. उच्च न्यायालयाने अथवा मा. सर्वोच्च न्यायालयाने त्याबाबत निर्णय दिल्यास त्या निर्णयानुसार संबंधीत जिल्हाधिकारी यांनी अंमलबजावणी करावी.

३. हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ चे कलम ६(१) नुसार तसेच जोडतक्ता २-अ, लेजर अकाउंट नुसार मदतमाश म्हणून जाहीर करण्यात आलेली जमीन जर वक्फ बोर्डाने वक्फ अधिनियम, १९५४ च्या कलम ५(२)अन्वये वक्फ मालमत्ता म्हणून जाहिर केली असेल तर, वक्फ बोर्ड जोपर्यंत जाहिर केलेल्या जमीनीच्या

यादीमधून जाहिर करण्यात आलेल्या या जमीनीचा तपशील वगळत नाही तोपर्यंत महसूल अभिलेखानुसार ही जमीन मदतमाश म्हणून नोंद घ्यावयाची कार्यवाही करण्यात येऊ नये. मात्र वर २ येथे नमूद केल्यानुसार वरिष्ठ न्यायालयाने निर्णय दिला असल्यास त्याप्रमाणे महसूल अभिलेखात नोंद घेण्याची कार्यवाही करता येईल.

४. शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्रमांक-जमीन-२०१८/प्र.क्र. ९०/ज-१ दिनांक ८.३.२०१९ व दिनांक २७.३.२०२३ मधील तरतुदीनुसार या मदतमाश जमिनीचे भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरण करताना/कृषीतर प्रयोजनासाठी करण्यात आलेली हस्तांतरणे नियमित करताना रुपांतरण अधिमूल्याची रक्कम ₹१ कोटी पेक्षा अधिक आहे, अशा प्रकरणी रुपांतरण करण्यापूर्वी शासनाची पूर्व मान्यता घेण्यात यावी.

५. तसेच, या मदतमाश जमीनीच्या प्रकरणी परवानगी शिवाय हस्तांतरण / वापरात बदल केला असल्यास शेवटचा शर्तभंग हाच एकमेव शर्तभंग समजून अशी प्रकरणे शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक जमीन-२०२२/प्र.क्र.१०६/ज१, दिनांक ५ जूलै २०२३ मधील तरतूदीनुसार नियमानुकुल करण्यासाठी शासनास सादर करण्यात यावीत.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३०३१२१५५६३०१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2025.03.03 17:46:04 +05'30'

**( संजय धारुरकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
५. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
८. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजी नगर
९. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजी नगर, परभणी, हिंगोली, जालना, नांदेड, बीड, धाराशिव, लातूर.
१०.सर्व प्रशासनिक विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (कार्यासन ज-७)

RNI No. MAHENG /2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष ११, अंक १(७)] बुधवार, जानेवारी १, २०२५/पौष ११, शके १९४६ [पृष्ठे २, किंमत : रुपये २७.००

**असाधारण क्रमांक ७**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (*3*) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants (Amendment) Act, 2024 (Mah. Act VII of 2025), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SATISH WAGHOLE,
Secretary (Legislation) to Government,
Law and Judiciary Department.

---

**MAHARASHTRA ACT No. VII OF 2025.**

*(First published, after having received the assent of the Governor in the "Maharashtra Government Gazette", on the 1st January 2025).*

An Act further to amend the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants Act, 1954.

WHEREAS both Houses of the State Legislature were not in session ;

AND WHEREAS the Governor of Maharashtra was satisfied that circumstances existed which rendered it necessary for him to take immediate action further to amend the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants Act, 1954 for the purposes hereinafter appearing ; and, therefore, promulgated the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants (Amendment) Ordinance, 2024 on the 24th September 2024 ;

Hyd. Act No. VIII of 1955. Mah. Ord. VIII of 2024.

AND WHEREAS it is expedient to replace the said Ordinance, by an Act of the State Legislature ; it is hereby enacted in the Seventy-fifth Year of the Republic of India as follows :—

Short title and commencement.

**1.** (*1*) This Act may be called the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants (Amendment) Act, 2024.

(*2*) It shall be deemed to have come into force on the 24th September 2024.

Amendment of section 2A of Hyd. Act No. VIII of 1955.

**2.** In section 2A of the Hyderabad Abolition of Inams and Cash Grants Act, 1955 (hereinafter referred to as "the principal Act"), to sub-section (*3*), the following proviso shall be added, namely :— Hyd. Act No. VIII of 1955.

" Provided that, where in exceptional cases, upon complaints regarding legality of decision of officer under sub-section *(1)*, the State Government is satisfied that it is necessary to examine the legality, propriety or regularity of such orders even after expiry of the period of one year, the State Government or the Divisional Commissioner authorised by it, may exercise such powers after expiry of the said period.".

Amendment of section 6 of Hyd. Act No. VIII of 1955.

**3**. In section 6 of the principal Act, in sub-section (*3*),—

(*1*) in clause (*a*),—

*(a)* in the first proviso, for the words "fifty per cent.", the words "five per cent." shall be substituted ;

*(b)* in the second proviso, for the words "fifty per cent. of the current market value of such land", at both the places where they occur, the words "five per cent. of the current market value of such land" shall be substituted ;

(*2*) in clause (*b*), in the proviso, for the words "fifty per cent.", the words "five per cent." shall be substituted.

Repeal of Mah. Ord. VIII of 2024 and saving.

**4.** (*1*) The Hyderabad Abolition of Inams and Cash Grants (Amendment) Ordinance, 2024, is hereby repealed. Mah. Ord. VIII of 2024.

(*2*) Notwithstanding such repeal, anything done or any action taken (including any notification or order issued) under the corresponding provisions of the principal Act, as amended by the said Ordinance, shall be deemed to have been done, taken or issued, as the case may be, under the corresponding provisions of the principal Act, as amended by this Act.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE.

RNI No. MAHBIL /2009/35530




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग चार

वर्ष ११, अंक १(७)] बुधवार, जानेवारी १, २०२५/पौष ११, शके १९४६ [पृष्ठे २, किंमत : रुपये २३.००

**असाधारण क्रमांक ७**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक ३१ डिसेंबर २०२४ रोजी माननीय राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**सतिश वाघोले,**
सचिव (विधि विधान),
महाराष्ट्र शासन,
विधि व न्याय विभाग.

---

**सन २०२५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७.**

(माननीय राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर **“ महाराष्ट्र शासन राजपत्रात ”** दिनांक १ जानेवारी २०२५ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अधिनियम.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नव्हते ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांकरिता, हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ यात आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली होती ; आणि, म्हणून, त्यांनी दिनांक २४ सप्टेंबर २०२४, रोजी हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अध्यादेश, २०२४, हा प्रख्यापित केला होता ; १९५५ चा हैद्राबाद अधिनियम क्रमांक ८. २०२४ चा महा. अध्या. ८.

**आणि ज्याअर्थी,** उक्त अध्यादेशाचे राज्य विधानमंडळाच्या अधिनियमात रुपांतर करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या पंच्याहत्तराव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ. **१.** (१) या अधिनियमास, हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम, २०२४, असे म्हणावे.

(२) तो, दिनांक २४ सप्टेंबर २०२४ रोजी अंमलात आला असल्याचे मानण्यात येईल.

सन १९५५ चा हैद्राबाद अधिनियम क्रमांक ८ याच्या कलम २अ ची सुधारणा. **२.** हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ (यात यापुढे ज्याचा निर्देश, "मुख्य अधिनियम" असा केला आहे) याच्या कलम २अ मधील, पोट-कलम (३) नंतर, पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :— १९५५ चा हैद्राबाद अधिनियम क्रमांक ८.

"परंतु, जेव्हा अपवादात्मक प्रकरणांमध्ये, पोट-कलम (१) खालील अधिका-याच्या निर्णयाच्या कायदेशीरपणासंबंधीच्या तक्रारींवरून, एक वर्षाचा कालावधी संपल्यानंतर देखील अशा आदेशांचा कायदेशीरपणा, औचित्य किंवा नियमितपणा तपासणे आवश्यक आहे, अशी राज्य सरकारची खात्री पटली असेल त्या बाबतीत, राज्य सरकारला किंवा त्याने प्राधिकृत केलेल्या विभागीय आयुक्तास, उक्त कालावधी संपल्यानंतर अशा अधिकारांचा वापर करता येईल.".

सन १९५५ चा हैद्राबाद अधिनियम क्रमांक ८ याच्या कलम ६ ची सुधारणा. **३.** मुख्य अधिनियमाच्या कलम ६ मध्ये, पोट-कलम (३) मधील,—

(१) खंड (अ) मध्ये, —

(अ) पहिल्या परंतुकामधील, " पन्नास टक्के " या मजकुराऐवजी, " पाच टक्के " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ब) दुस-या परंतुकामधील, " अशा जमिनीच्या चालू बाजार मूल्याच्या पन्नास टक्के " हा मजकूर, ज्या दोन ठिकाणी आला आहे त्या दोन्ही ठिकाणी त्याऐवजी, " अशा जमिनीच्या चालू बाजार मूल्याच्या पाच टक्के " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(२) खंड (ब) मध्ये, परंतुकामधील, " पन्नास टक्के " या मजकुराऐवजी, " पाच टक्के " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन २०२४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक ८ यांचे निरसन व व्यावृत्ती. **४.** (१) हैद्राबाद इनामे व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत (सुधारणा) अध्यादेश, २०२४, हा, याद्वारे, निरसित करण्यात येत आहे. २०२४ चा महा. अध्या. ८.

(२) अशाप्रकारे निरसन झाले असले तरी, उक्त अध्यादेशाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमाच्या संबंधित तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही कृती किंवा कोणतीही कार्यवाही (काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा दिलेला आदेश यांसह) ही, या अधिनियमान्वये सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमाच्या संबंधित तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही कृती, कार्यवाही किंवा, यथास्थिती, काढण्यात आलेली अधिसूचना किंवा दिलेला आदेश असल्याचे मानण्यात येईल.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE.